प्रतिवर्षी हयातीचा दाखला सादर करण्यासाठी निवृत्तीवेतन / कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांना उपलब्ध असलेले विविध पर्याय.........

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.९९/२१/कोषा-प्रशा५**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक: २२ डिसेंबर, २०२१.**

**वाचा** : १.वित्त विभाग, शासन निर्णय क्र. निवेयो १००७/ प्र क्र.१२०/ कोषा-प्रशा५, दि.१८.०८.२००८
२.वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/ प्र क्र.२४/ कोषा- प्रशा५, दि.१५.०१.२०१६
३.केंद्र शासन, कार्मिक, लोक शिकायत और पेन्शन मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन दि.२०.०९.२०२१.
४. केंद्र शासन कार्मिक, लोक शिकायत और पेन्शन मंत्रालय यांचे कार्यालयीन परिपत्रक दि. २०.०२.२०२०.

**शासन परिपत्रक**

महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, नियम क्र. ३३५ अन्वये वर्षातून एकदा निवृत्तीवेतनधारकांनी हयातीचे प्रमाणपत्र कोषागारास सादर करण्याची तरतूद आहे. सर्व निवृत्तीवेतनधारक/ कुटुंबनिवृत्तीवेतनधारक यांचा हयात असल्याचा दाखला (Life Certificate) दरवर्षी दि.१ नोव्हेंबर रोजी बँकेमार्फत स्विकृत करण्यात येतो. हयातीचा दाखला विहित मुदतीत कोषागार/अधिदान व लेखा कार्यालयास प्राप्त न झाल्यास कोषागार अधिकारी/ अधिदान व लेखा अधिकारी यांचेकडून पुढील निवृत्तीवेतन रोखण्यात येते. निवृत्तीवेतनधारक/ कुटुंबनिवृत्तीवेतनधारक वार्षिक हयातीचे प्रमाणपत्र (Life Certificate) सादर करण्याकरीता त्यांना सोयीस्कर ठरेल अशा खालीलपैकी कोणत्याही पर्यायांचा अवलंब करु शकतील.

१. निवृत्तीवेतन घेत असलेल्या बँकेमध्ये प्रत्यक्ष हजर राहून हयातीच्या दाखल्यावर बँक व्यवस्थापकासमोर स्वाक्षरी करता येईल.
२. राज्य शासनाच्या कोणत्याही राजपत्रित अधिकाऱ्याने सही व शिक्क्यासह साक्षांकीत केलेला हयातीचा दाखला कोषागारास सादर करता येईल.
३. https://jeevanpramaan.gov.in या वेबपोर्टलद्वारे घरबसल्या हयातीचा दाखला ऑनलाइन सादर करता येईल. जीवनप्रमाण पोर्टलवर हयातीचा दाखला ऑनलाइन सादर करण्याची कार्यपध्दती You tube माध्यमावर **https://youtu.be/nNMIkTYqTF8** लिंक वर उपलब्ध आहे. यादृष्टीने बायोमेट्रीक ठसे हस्तगत करण्यासाठी UIDAI यांनी मान्यता दिलेल्या बायोमेट्रिक डिव्हाइसची माहिती www.uidai.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

४. भारतीय डाक विभागाने India Post Payment Bank (IPPB) च्या माध्यमातून डिजीटल हयातीचा दाखला ऑनलाइन सादर करण्याची सुविधा सशुल्क उपलब्ध करुन दिली आहे. सदर सेवा वापराची विनंती टपाल विभागाकडे स्वत:च्या भ्रमणध्वनीद्वारे करण्यासाठी “Postinfo App” गुगल play store वरुन डाउनलोड करावे. ज्या निवृत्तीवेतनधारकांना/ कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांना भ्रमणध्वनी वापरणे शक्य नाही, त्यांनी नजीकच्या टपाल कार्यालयास भेट दयावी. सदर सुविधा वापराची विनंती टपाल विभागाकडे नोंदविल्यानंतर टपालवाहक आवश्यक साहित्यासह निवृत्तीवेतनधारकाच्या निवासस्थानी येऊन बोटांचे ठसे घेईल. सदरची सुविधा सशुल्क असल्याची नोंद घ्यावी. टपालवाहकामार्फत ऑनलाइन डिजीटल हयातीचा दाखला सादर करण्याची सविस्तर माहिती You tube माध्यमावर **https://youtu.be/cERwM U7g54** या लिंकवर उपलब्ध आहे.

५. विदेशात वास्तव्यास असणारे निवृत्तीवेतनधारक/कुटुंबनिवृत्तीवेतनधारक भारतीय दूतावास (Indian Embassy), भारतीय उच्चआयुक्तालय ( High commissionerate of India) अथवा भारतीय वाणिज्य दूतावास (Indian Consulate) येथील प्राधिकृत अधिकाऱ्यांमार्फत हयातीचा दाखला सादर करु शकतील.

निवृत्तीवेतनधारक/ कुटुंबनिवृत्तीवेतनधारक वरीलपैकी कोणत्याही एका पध्दतीने हयातीचा दाखला संबंधित कोषागार कार्यालयास, अधिदान व लेखा कार्यालयास सादर करु शकतात. ऑनलाईन हयातीचा दाखला सादर करण्याच्या संदर्भात अधिक माहितीकरिता उपरोक्त नमूद संकेतस्थळास भेट दयावी अथवा संबंधित जिल्हा कोषागार/ अधिदान व लेखा कार्यालयातील निवृत्तीवेतन शाखा येथे संपर्क करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२११२२२१११३४३३५०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, pseudonym=CAD826A943AA15444490C64B66C7EE464C4AD05A, serialNumber=D4994742192306FCC1DEA9AADD3810639506519FA652B919767B98B04E905A18, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2021.12.22 11:14:51 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व मा.विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

५.सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

७.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख

८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई

९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई

१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई

११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२

१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१

१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई

१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई

१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली

२२.सर्व विभागीय आयुक्त

२३.सर्व जिल्हाधिकारी

२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे / नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर

२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर

३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१.निवड नस्ती कोषा प्रशा.५